**सन २०२१-२२ पासून +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाच्या नवीन संस्था व अधिकच्या तुकडयांना कायमस्वरुपी विनाअनुदानित तत्वावर व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : व्हिओसी-२०२२/प्र.क्र.०३/कौशल्य-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०८ फेब्रुवारी, २०२२

वाचा : १) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग शासन निर्णय क्रमांक व्हीओसी-२०१७/प्र.क्र.१५७/व्यशि-४, दिनांक १० मे,२०१८.
२) कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागाचे पत्र क्र.व्हिओसी-२०१७/प्र.क्र.१५७/व्यशि-४, दि. १२ जून, २०२० व दि.११ ऑगस्ट, २०२१.
३) संचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र.८ व्हीओसी/मान्यता/२०२१/१०६, दि.२७ डिसेंबर,२०२१.
४) संचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र.८ व्हीओसी/मान्यता/२०२१/१०७, दि.२७ डिसेंबर,२०२१.

**प्रस्तावना :**

पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम, +२ स्तरावरील व्दिलक्षी तसेच उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रमाच्या नवीन संस्था व अधिकच्या तुकडयांना कायमस्वरुपी विनाअनुदानित तत्त्वावर व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यास परवानगी देण्यासाठीच्या ऑनलाईन प्रमाणित कार्यपध्दतीस विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील दिनांक १० मे, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम व +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमास मान्यता देण्याबाबतच्या कार्यपध्दतीस संदर्भ क्र. २ येथील दिनांक १२ जून, २०२० रोजीच्या पत्रान्वये मान्यता देण्यात आली आहे.

सन २०२१-२२ करीता पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम, +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमांच्या नवीन संस्था व अधिकच्या तुकडयांना कायमस्वरुपी विनाअनुदानित तत्वावर मान्यता देण्याकरीता विहीत मुदतीत ज्या संस्थांनी शासनाच्या vti.dvet.gov.in या वेबपोर्टलवर मान्यतेकरीता अर्ज केले होते व व्यवसायास आवश्यक सर्व सोई-सुविधा पूर्ण करुन निरीक्षणाकरीता विनंती केली होती अशा संस्थांचा निरीक्षण कार्यक्रम शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांनी नेमलेल्या समित्यांमार्फत पूर्ण करण्यात आला आहे. सदर निरीक्षण समित्यांनी त्याचे निरीक्षण अहवाल vti.dvet.gov.in या वेबपोर्टलवर अपलोड केले आहेत. त्यानुसार निरीक्षण समित्यांनी अहवाल तपासून मान्यतेकरीता शिफारस केली आहे.

द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम सुरू करण्याकरिता प्राप्त झालेल्या अर्जाची संचालनालयास्तरावर छानननी करून संचालनालयाकडून योग्य त्या शिफारशीसह प्रस्ताव संदर्भ क्र.३ व ४ येथील दिनांक २७ डिसेंबर, २०२१ च्या पत्रान्वये प्राप्त झाला आहे. त्यानुसार सन २०२१-२२ पासून द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाच्या नवीन संस्था व अधिकच्या तुकडयांना कायमस्वरुपी विनाअनुदानित तत्त्वावर व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

**शासन निर्णय :**

शैक्षणिक संस्थांकडून ई-मेलद्वारे प्राप्त दस्ताऐवजांची छाननी करुन त्यानुसार आवश्यक मानकांची पूर्तता करणाऱ्या संस्थांना +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यावसायिक अभ्यासक्रम सुरू करण्यास मान्यता मिळण्याबाबत संचालनालयाकडून शिफारस करण्यात आली आहे त्या संस्थांचा तपशिल सोबतच्या प्रपत्र “अ” मध्ये सोबत जोडण्यात आला आहे.

सन २०२१-२२ पासून द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाच्या विद्यमान तसेच नवीन संस्थेत नवीन/अधिकच्या तुकडयांना कायमस्वरुपी विनाअनुदानित तत्वावर व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती:-**

१. संबंधित संस्थेस माध्यमिक शाळा संहिता १९८१ मध्ये नमुद केलेल्या सर्व अटी व शर्तींची पुर्तता करणे बंधनकारक राहील. परवानगी प्राप्त झाल्यानंतर संस्थेला महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ नुसार आवश्यक ते सर्व लेखे संस्था स्तरावर ठेवणे बंधनकारक राहील. संस्थेने माध्यमिक शाळा सहितेतील नियमांचे पालन न केल्यास अथवा शासनाने व संचालनालयाने दिलेल्या आदेशाचे, परिपत्रकाचे पालन न केल्यास संस्थेची मान्यता तात्काळ रद्द करण्यात येईल.
२. मान्य अभ्यासक्रमांच्या नवीन/अधिकच्या तुकडया सुरु करण्यास कायमस्वरुपी विनाअनुदान तत्वावर मान्यता दिली असली तरीही, भविष्यात कोणत्याही प्रकारचे अनुदान अथवा आर्थिक मदत देण्यात येणार नाही.
३. मान्य अभ्यासक्रम राबविणा-या संस्थांना शासन/संचालनालय/संचालनालयाच्या अखत्यारीतील संबंधित कार्यालये यांच्याकडून वेळोवेळी निर्गमित होणा-या आदेशांचे पालन करणे बंधनकारक राहील.
४. शासनाने वेळोवेळी निश्चित केलेले शिक्षण शुल्क विदयार्थ्यांकडून आकारणे संस्थेस बंधनकारक राहील.संस्थेस कमाल मर्यादेपेक्षा जास्त शुल्क विदयार्थ्यांकडून आकारता येणार नाही.
५. **“कायमस्वरुपी विनाअनुदान तत्वावर मान्यता मिळालेले +२ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम”**असा सूचनाफलक संस्थांनी दर्शनी भागावर लावणे बंधनकारक राहील. सूचना फलकावर अभ्यासक्रमांच्या मंजूर तुकडयांची संख्या व मंजूर प्रवेशक्षमता यांचा उल्लेख करण्यात यावा.

६. सदर अभ्यासक्रमांना कायमस्वरुपी विनाअनुदान तत्वावर मान्यता देण्यात आल्यामुळे या अभ्यासक्रमाकरीता संस्थेने नियुक्त केलेल्या सर्व कर्मचारी वर्गाची सेवा /वेतन व तद्नुषंगिक बाबींची सर्वस्वी जबाबदारी संबंधित संस्थेची राहील.याबाबत शासन कोणतीही जबाबदारी घेणार नाही.

७. मंजूर अभ्यासक्रमाकरीता आवश्यक शिक्षकीय कर्मचा-यांच्या नियुक्त्या, त्यांची किमान शैक्षणिक अर्हता, अनुभव याबाबत संस्थेने महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली,१९८१ मधील तरतुदींनुसार तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार तात्काळ करण्यात यावी व संबंधित जिल्हयाचे जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांनी प्रवेश याद्यांना मान्यता देण्यापूर्वी विहीत अर्हताधारक शिक्षकीय कर्मचा-यांची नियुक्ती करण्यात आली आहे याची खात्री करावी व त्यानंतरच प्रवेश याद्यांना मान्यता द्यावी. याबाबत केलेल्या कार्यवाहीचा अहवाल संचालनालयास प्रादेशिक कार्यालयामार्फत सादर करावा.

८. भविष्यात सदरचे अभ्यासक्रम बंद करण्याबाबत किंवा त्यात काही बदल करण्याबाबत शासनाने धोरणात्मक निर्णय घेतल्यास तो विनाअट व विनाविलंब संस्थेने अंमलात आणणे आवश्यक राहील.

९. अभ्यासक्रमांच्या मंजूर तुकडयांमधील प्रवेशाकरीता, शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले सामाजिक/समांतर आरक्षण व इतर नियमांचे संस्थेने काटेकोरपणे पालन करावे व गुणानुक्रमे प्रवेश देण्यात यावेत.

१०. अभ्यासक्रमांना मंजूरी मिळाल्यानंतर सदर अभ्यासक्रम संस्थेत सुरू केल्याची माहिती संस्थेने महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळास तात्काळ द्यावी व त्याबाबतची अनुषंगिक कार्यवाही करावी.

११. मान्यता देण्यात आलेल्या अभ्यासक्रमाच्या अधिकच्या/नवीन तुकडयांची प्रवेशक्षमता प्रती तुकडी ५० इतकी असुन,मंजूर प्रवेशक्षमतेच्या ५०% पेक्षा कमी प्रवेश झाल्यास अश्या तुकडया सुरू ठेवण्याकरीता संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिका-यांची परवानगी घेणे आवश्यक राहील.

१२. मान्यता प्राप्त अभ्यासक्रम मान्यता दिलेल्या शैक्षणिक वर्षात संस्थेने सुरु न केल्यास अथवा सदर अभ्यासक्रमाच्या तुकडीत सतत ३ वर्ष मंजूर प्रवेशक्षमतेच्या ५०% पेक्षा कमी प्रवेश झाल्यास सदर संस्थेची मान्यता आपोआप संपुष्ठात येईल. तद्नंतर संस्थेस सदर अभ्यासक्रम सुरु करण्यासाठी मान्यता प्रक्रिया नव्याने करणे आवश्यक राहील.

१३. शासनाने मान्यता दिलेल्या व्यवसाय अभ्यासक्रमाचा दर्जा व गुणवत्ता उच्च प्रतीचा राखण्याच्या दृष्टीने संचालनालय स्तरावरुन नियमितपणे प्रवेशित विद्यार्थ्यांची प्रशिक्षण गुणवत्ता तपासण्यासाठी प्रत्येक वर्षी ७५% पेक्षा कमी निकाल असणाऱ्या संस्थेचे प्रत्यक्ष निरीक्षण करण्यात येईल. एखाद्या संस्थेचा निकाल सतत ३ वर्षामध्ये ७५% पेक्षा कमी असल्यास सदर संस्थेची मान्यता रद्द करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करण्यात येईल.

१४. शैक्षणिक गुणवत्ता वाढविण्यासाठी उपरोक्त अटी व शर्तीमध्ये बदल करण्याचे किंवा नवीन अटी व शर्ती अंर्तभूत करण्याचे अधिकार शासनास राहतील.

१५. संबंधित संस्थेने त्यांच्याकडे भाषा/जीवशास्त्र इत्यादी विषयाचे शिक्षक, मंजूर केलेल्या द्विलक्षी अभ्यासक्रमाच्या तुकडीमुळे अतिरिक्त ठरणार नाहीत याची खातरजमा करूनच विद्यार्थ्यांना प्रवेश द्यावा.

१६. व्यवसाय अभ्यासक्रमांतर्गत मंजूर व्यवसाय अभ्यासक्रमाच्या मंजूर तुकडीनुसार मंजूर प्रवेशक्षमतेपेक्षा अतिरिक्त अनधिकृत प्रवेश करता येणार नाही. याकरीता संस्थेस "महाराष्ट्र राज्यात कृषि, पशु व मत्स्य विज्ञान, आरोग्य विज्ञान, उच्च तंत्र व व्यवसाय शिक्षण यांमधील अनधिकृत संस्था स्थापन करणे आणि अनधिकृत अभ्यास पाठ्यक्रम सुरु करणे (प्रतिबंध) अधिनियम, २०१३" लागू राहील.

१७. द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमातील विषयामध्ये शासनाने राष्ट्रीय कौशल्य पात्रता आराखडा (NSQF) नुसार बदल केल्यास त्याप्रमाणे अभ्यासक्रम राबविणे संस्थेवर बंधनकारक राहील.

३. शैक्षणिक वर्ष २०२१-२२ मध्ये प्रपत्र "अ" मध्ये मान्यता दिलेल्या किती संस्थांनी व्यवसाय अभ्यासक्रम सुरू केले, याबाबत तसेच अभ्यासक्रमनिहाय प्रवेशित विद्यार्थी संख्या याबाबतची माहिती संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी शासनास दि. ३१ मार्च, २०२२ पर्यंत सादर करावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२२०२०८१६०९१०७३०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRADEEP SAHEBRAO SHIVTARE

Digitally signed by PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
DN: CN = PRADEEP SAHEBRAO SHIVTARE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SKILL DEVELOPMENT AND ENTREPRENEURSHIP DEPARTMENT
Date: 2022.02.08 16:15:03 +05'30'

**( प्रदीप सा.शिवतरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत ,**

१.मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,
२.मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा.अध्यक्ष, विधानसभा,महाराष्ट्र राज्य
४. मा.सभापती,विधानपरिषद सदस्य,महाराष्ट्र राज्य
५. सर्व मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६.सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७.मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
८.सर्व विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
९.मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
१०.मा. अपर मुख्य सचिव ,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक , मंत्रालय, मुंबई
११. मा. प्रधान सचिव ,कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक , मंत्रालय, मुंबई
१२.संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१३. सर्व विभागीय शिक्षण उप संचालक, (शालेय शिक्षण विभाग), (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)
१४. सहसंचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय,मुंबई/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपूर (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)
१५. संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, ( व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)
१६. संबंधित अशासकीय संस्था (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्ष
१७. निवड नस्ती. (कौशल्य-२).

कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र.व्हिओसी-२०२२/प्र.क्र.०३/कौशल्य-२,
दि.०८ फेब्रुवारी, २०२२ सोबतचे प्रपत्र अ

**शैक्षणिक सत्र २०२१-२२ पासून +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमांच्या नविन संस्था/विद्यमान संस्थेत अधिकच्या तुकडयांना कायम विनाअनुदानित तत्वावर सुरु करण्यास मान्यता देण्यात येणाऱ्या संस्थाची यादी**

| अ.क्र. | विभागाचे नाव | ऑनलाईन नोंदणी क्रमांक | संस्थेचे नाव | मागणी केलेल्या व्यवसाय अभ्यासक्रमाचे नाव | तुकडयांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | मुंबई | PBF००३५४T | नालंदा एज्युकेशनल ट्रस्ट मुलुंड (प.) मुंबई संचलित सेंट झेव्हियर्स ज्युनिअर कॉलेज ऑफ सायन्स कल्याण जि.ठाणे | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| २ | मुंबई | PBF१९०६५T | पाल राजेंद्र एज्युकेशन ट्रस्ट संचलित अल्फा ज्युनिअर कॉलेज ऑफ कार्मस ॲन्ड सायन्स शहाजे राजे मार्ग, विलेपार्ले मुंबई-५७ | कॉम्प्युटर सायन्स | २ |
| ३ | पुणे | PBF३१४१९T | सांगोला तालुका शिक्षण प्रसारक मंडळ सांगोला संचलित सांगोला विद्यामंदिर ज्युनिअर कॉलेज सांगोला जि.सोलापूर | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| ४ | पुणे | PBF०९७२५T | संकल्प बहुउद्देशीय सेवा संस्था संचलित डॉ चंद्रभानू सोनवणे कनिष्ठ महाविद्यालय, उक्कडगांव, ता. बार्शी जि.सोलापूर | क्रॉप सायन्स | १ |

कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र.व्हिओसी-२०२२/प्र.क्र.०३/कौशल्य-२, दि.०८ फेब्रुवारी, २०२२ सोबतचे प्रपत्र अ

**शैक्षणिक सत्र २०२१-२२ पासून +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमांच्या नविन संस्था/विद्यमान संस्थेत अधिकच्या तुकडयांना कायम विनाअनुदानित तत्वावर सुरु करण्यास मान्यता देण्यात येणाऱ्या संस्थाची यादी**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ५ | पुणे | PBF२१०४१T | शेतकरी शिक्षण प्रसारक मंडळ, संचलित कृष्णा महाविद्यालय, रेठरे (बु) शिवनगर ता.कराड जि.सातारा | ॲनिमल सायन्स ॲण्ड डेअरी | १ |
| ६ | पुणे | PBF३१२९७T | शांती शिक्षण प्रसारक मंडळ संचलित शांती ज्युनिअर कॉलेज ऑफ सायन्स, न्यु संतोषनगर सोलापूर | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| | | | | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ७ | पुणे | PB३१४९२T | महाराष्ट्र ॲकेडमी ऑफ इंजिनिअरिंग ॲण्ड एज्यूकेशनल रिसर्च पुणे संचलित विश्वशांती गुरुकुल स्कुल केगाव ता.उत्तर सोलापूर जि.सोलापूर | क्रॉप सायन्स | १ |
| | | | | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ८ | पुणे | PBF३१३५२T | तुळजाभवानी महिला मंडळ संचलित हेमुजी चंदेले कनिष्ठ महाविद्यालय, शेळगांव (आर) बार्शी जि.सोलापूर | क्रॉप सायन्स | १ |
| ९ | पुणे | PB३११११T | महाराष्ट्र ॲकेडमी ऑफ इंजिनिअरिंग ॲण्ड एज्यूकेशनल रिसर्च पुणे संचलित माईर्स विश्वशांती गुरुकुल स्कुल कर्नाळा ता.मिरज जि.सांगली | क्रॉप सायन्स | १ |
| | | | | इलेक्ट्रॉनिक्स | १ |

कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र.व्हिओसी-२०२२/प्र.क्र.०३/कौशल्य-२,
दि.०८ फेब्रुवारी, २०२२ सोबतचे प्रपत्र अ

**शैक्षणिक सत्र २०२१-२२ पासून +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमांच्या नविन संस्था/विद्यमान संस्थेत अधिकच्या तुकडयांना कायम विनाअनुदानित तत्वावर सुरु करण्यास मान्यता देण्यात येणाऱ्या संस्थाची यादी**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १० | पुणे | PBF०६४११T | डी.ए.व्ही. कॉलेज ट्रस्ट आणि मॅनेजमेंट सोसायटी, नवी दिल्ली संचलित वाती कनिष्ठ महाविद्यालय करकंब सोलापूर | क्रॉप सायन्स | १ |
| ११ | नाशिक | PBF१९९९१T | विश्वात्मक जंगली महाराज आश्रम ट्रस्ट संचलित ओम गुरुदेव इंग्लिश मीडियम गुरुकुल कोकमठाम ता.कोपरगांव जि.अहमदनगर | हॉर्टिकल्चर | १ |
| | | | | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| १२ | औरंगाबाद | PBF३१३६६T | जय महाराष्ट्र सेवाभावी संस्था संचलित सह्याद्री प्राथमिक ते उच्च माध्यमिक विद्यालय, मु.पारडी, पो.लोहा ता. लोहा, जि.नांदेड | क्रॉप सायन्स | १ |
| | | | | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| १३ | औरंगाबाद | PBF३११४०T | जनता शिक्षण प्रसारक मंडळ संचलित शिवाजी उच्च माध्यमिक विद्यालय सिडको, नांदेड | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| १४ | औरंगाबाद | PBF३११४१T | जनता शिक्षण प्रसारक मंडळ संचलित नरसिंह विद्यामंदिर उमरदारी, ता.मुखेड जि.नांदेड | कॉम्प्युटर सायन्स | १ |

कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र.व्हिओसी-२०२२/प्र.क्र.०३/कौशल्य-२, दि.०८ फेब्रुवारी, २०२२ सोबतचे प्रपत्र अ

| **शैक्षणिक सत्र २०२१-२२ पासून +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमांच्या नविन संस्था/विद्यमान संस्थेत अधिकच्या तुकडयांना कायम विनाअनुदानित तत्वावर सुरु करण्यास मान्यता देण्यात येणाऱ्या संस्थाची यादी** | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १५ | औरंगरबाद | PBF२०९२५T | अजिंक्य क्रीडा मंडळ वाशी संचलित अजिंक्य विद्यामंदिर वाशी ता.वाशी जि.उस्मानाबाद | क्रॉप सायन्स | १ |
| १६ | औरंगाबाद | PBF३१३६४T | अखिल सेवाभावी शिक्षण प्रसारक मंडळ संचलित ब्ल्यू बेल्स इंग्रजी उच्च माध्यमिक विद्यालय,नायगांव जि.नांदेड | क्रॉप सायन्स | २ |
| १७ | औरंगाबाद | PBF३१४८३T | तुळजाभवानी महिला मंडळ संचलित मॉडर्न हायस्कुल ॲन्ड ज्युनिअर कॉलेज सांगवी (काटी) तुळजापूर जि.उस्मानाबाद | क्रॉप सायन्स | १ |
| १८ | औरंगाबाद | PBF३११५९T | श्री.शामगीर शिक्षण संस्था संचलित जयभारत उच्च माध्यमिक विद्यालय दापका ता.निलंगा जि.लातूर | क्रॉप सायन्स | १ |
| १९ | औरंगाबाद | PBF३१०८४T | वसंतराव नाईक शिक्षण प्रसारक मंडळ संचलित व्ही आर स्कॉलर डेन स्कुल औरंगाबाद | क्रॉप सायन्स | १ |
| | | | | बँकींग | १ |
| | | | | कॉम्प्युटर सायन्स | १ |

कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र.व्हिओसी-२०२२/प्र.क्र.०३/कौशल्य-२, दि.०८ फेब्रुवारी, २०२२ सोबतचे प्रपत्र अ

**शैक्षणिक सत्र २०२१-२२ पासून +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमांच्या नविन संस्था/विद्यमान संस्थेत अधिकच्या तुकडयांना कायम विनाअनुदानित तत्वावर सुरु करण्यास मान्यता देण्यात येणाऱ्या संस्थाची यादी**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २० | औरंगाबाद | PBF३१५००T | तिरुपती बहुउद्देशीय सेवाभावी संस्था संचलित, आदर्श प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक मु.पो.जामखेड ता.अंबड जि.जालना | क्रॉप सायन्स | १ |
| २१ | औरंगाबाद | PBF२०९४१T | निती निकेतन सेवाभावी संस्था संचलित गाडगेबाबा कनिष्ठ महाविद्यालय, सोनखेड ता.लोहा जि.नांदेड | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| २२ | अमरावती | PBF०१०५१T | एकता शिक्षण प्रसारक मंडळ संचलित एकता ज्युनिअर कॉलेज यवतमाळ | फ्रेश वॉटर आणि फिश कल्चर | १ |
| २३ | अमरावती | PBF३१५१६T | स्व.रामजी रुडे शिक्षण व क्रिडा बहुउद्देशीय सेवाभावी संस्था, संचलित श्री.भाऊरावजी रुडे इंग्लिश मिडीअम स्कुल, उमरी पठार ता.आर्णी जि.यवतमाळ | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| २४ | अमरावती | PBF२०६६९T | सेठ बन्सीधर दहिगांवकर हायस्कुल एज्युकेशन सोसायटी संचलित व स्वामी विवेकानंद ज्ञानपीठ तेल्हारा जि.अकोला | कॉम्प्युटर सायन्स | १ |

कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र.व्हिओसी-२०२२/प्र.क्र.०३/कौशल्य-२,
दि.०८ फेब्रुवारी, २०२२ सोबतचे प्रपत्र अ

**शैक्षणिक सत्र २०२१-२२ पासून +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमांच्या नविन संस्था/विद्यमान संस्थेत अधिकच्या तुकडयांना कायम विनाअनुदानित तत्वावर सुरु करण्यास मान्यता देण्यात येणाऱ्या संस्थाची यादी**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २५ | नागपूर | PBF३१३९५T | श्री अवधूत बहुउद्देशीय सेवा संस्था, वर्धा संचलित श्री मोतीरामजी शिंदे माध्यमिक व उच्च माध्यमिक महाविद्यालय, मांडगाव ता.समुद्रपूर जि. वर्धा | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| २६ | नागपूर | PBF३१४१०T | सती माता शिक्षण संस्था नागपूर संचलित डॉ एम के उमाठे कॉलेज नागपूर प्लॉट क्र. ११, व्यंकटेश नगर, खामला रोड, नागपूर | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| २७ | नागपूर | PBF३१११४T | साई बहुउद्देशीय शिक्षण संस्था, नागपूर संचलित ग्रीन सिटी उच्च माध्यमिक विद्यालय, सौभाग्यनगर, हुडकेश्वर रोड, नागपूर | फ्रेश वॉटर आणि फिश कल्चर | १ |
| २८ | नागपूर | PBF३१२१५T | नागपूर शिक्षण मंडळ संचलित श्री.एम मोहता कनिष्ठ महाविद्यालय, उमरेड रोड,नागपूर | कॉम्प्युटर सायन्स | १ |